प्रतिनियुक्तीने नियुक्ती
**श्री. संजय अप्पासाहेब पवार, तहसिलदार**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. प्रतिनि-२०२४/प्र.क्र.१०३अ/ई-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २६ जुलै, २०२४

**संदर्भ** :- १) महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४(४) व ४(५) तसेच महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी, सेवेतून काढून टाकणे) नियम, १९८१ च्या नियम -४० मधील परिशिष्ट-२ मधील विहित अटी व शर्तीना अधीन राहून श्री. संजय अप्पासाहेब पवार, अधिक्षक जि.का.गडचिरोली यांची **महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई अंतर्गत शिबीर कार्यालय, रत्नागिरी येथे तहसिलदार संवर्गाच्या रिक्त पदावर ३ वर्षाच्या कालावधीसाठी** सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे.

२. सदरील आदेश तात्काळ अंमलात येत असून श्री. संजय अप्पासाहेब पवार, अधिक्षक जि.का.गडचिरोली यांना बदलीने पदस्थापना दर्शविण्यात आलेल्या पदावर तात्काळ रुजू होण्यासाठी ते धारण करत असलेल्या पदावरुन या आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत असून त्यांनी पदस्थापनेच्या पदावर तात्काळ रुजू व्हावे.

३. महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई या कार्यालयातील प्रतिनियुक्तीच्या अनुषंगाने श्री. संजय अप्पासाहेब पवार, अधिक्षक जि.का.गडचिरोली यांच्या सेवा उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचेकडे सुपूर्द करण्यात येत आहेत.

४. श्री. संजय अप्पासाहेब पवार, अधिक्षक जि.का.गडचिरोली यांनी पुढील सूचनांसाठी उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई यांचेकडे हजर व्हावे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्र २०२४०७२६१७५५५४०७१९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

AJIT SOPANRAO DESHMUKH

Digitally signed by AJIT SOPANRAO DESHMUKH
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=d36a0a6455652c60ea76104dd537113a9ca67ab14a315b9cefc36fc9be2915f8, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=704CB545C50221B15CDE7CCB8854E694C765DFB3A0240E891EBFB56EE79E3440, cn=AJIT SOPANRAO DESHMUKH
Date: 2024.07.26 18:11:16 +05'30'

**(अजित देशमुख)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रति,**

- उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ मर्यादित, मुंबई
- विभागीय आयुक्त, नागपूर/कोकण.

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा.मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- संबंधित तहसिलदार (विभागीय आयुक्त, नागपूर यांचेमार्फत).
- सह सचिव (ई-३) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती (ई-३).